**पोषण अभियान अंतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना प्रोत्साहन भत्ता अदा करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०२२/प्र.क्र.८१/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २५ मार्च,२०२२

वाचा:- (१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०१८/प्र.क्र.२७/का.६, दिनांक ११.०७.२०१८
(२) केंद्र शासनाचे पत्र क्र. PA/२९/२०१८-CPMU (e-६०५५२), दिनांक.०१.११.२०२१
(३) आयुक्त तथा राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/पोषण अभियान/का-४/२०२२/२८७, दिनांक २८.०१.२०२१

**प्रस्तावना :-**

पोषण अभियान या केंद्र पुरस्कृत उपक्रमाची संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यात अंमलबजावणी करण्यात येत आहे. पोषण अभियान अंतर्गत निर्धारित उद्दिष्टे साध्य करण्यासाठी विविध स्वरुपाचे Disbursement Linked Indicators ठरविण्यात आलेले आहेत. केंद्र शासनाकडून पोषण ट्रॅकर ॲप्लिकेशन सॉफ्टवेअरचा पूर्णपणे वापर करणा-या तसेच गृहभेटीच्या माध्यमातून THR पुरवठा लाभार्थ्यापर्यंत करणा-या अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना प्रोत्साहन भत्ता देणेबाबत मार्गदर्शक सूचना प्राप्त झालेल्या आहेत. त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या निकषानुसार दि.०१.०४.२०२१ ते दि.३१.१०.२०२१ या कालावधीमध्ये पात्र ठरणा-या अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना अनुक्रमे दरमहा रुपये ५००/- व रुपये २५०/- प्रोत्साहन भत्ता अदा करण्यास मान्यता देण्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.३ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पोषण अभियान अंतर्गत केंद्र शासनाने निर्धारित केलेले Disbursement Linked Indicators साध्य करण्यासाठी केंद्र शासनाने निर्धारित केलेल्या निकषानुसार पोषण ट्रॅकर ॲप्लिकेशन सॉफ़्टवेअरचा पूर्णपणे वापर करणा-या तसेच गृहभेटीच्या माध्यमातून लाभार्थ्यापर्यंत THR पुरवठा करणा-या अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना दि. ०१.०४.२०२१ ते दि. ३१.१०.२०२१ या कालावधीसाठी दरमहा अनुज्ञेय असणारा प्रोत्साहन भत्ता अनुक्रमे रु. ५००/- व रु. २५०/- अदा करण्यास व त्याकरिता येणा-या रु.५१,३२,५५,७५०/- (अक्षरी रुपये एकावन्न कोटी बत्तीस लक्ष पंचावन्न हजार सातशे पन्नास फ़क्त) एवढ्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रयोजनाखाली केंद्र शासनाच्या निकषांची पुर्तता होत असल्याबाबतची खातरजमा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी करण्याच्या अधिन राहून सदर शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा निधी शासनाच्या विहित धोरणानुसार व कार्यपध्दतीनुसार तसेच उपलब्धतेनुसार खर्च करणे आवश्यक राहील, याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

४. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च हा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पोषण अभियानांतर्गत संबंधित लेखाशिर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१५१५२१७०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
Date: 2022.03.25 16:18:07 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
५) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद.
११) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प.
१२) निवड नस्ती (का-६).